राज्यातील सागरी मच्छिमारांना क्यार, महा चक्रीवादळामुळे पूर्ण क्षमतेने मासेमारी करता आलेली नसल्यामुळे विशेष आर्थिक सहाय्य मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मत्स्यवि ११२०/ प्र.क्र. ९९/ पदुम १४**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**दिनांक : ९ सप्टेंबर, २०२०**

वाचा

१) आयुक्त मत्स्यव्यवसायमुंबई यांचे ,महाराष्ट्र राज्य , पत्र क्र. मत्स्य/ भू/०२०९०१/०८/२०१७, दि. २९.०५.२०२०, ०७.०६.२०२० व दि.१५.०७.२०२०

२) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक मत्स्यवि /१६६ क्र.प्र /२०१२-पदुम ,१४ दि .०५.०७.२००८

**प्रस्तावना :**

राज्यात सन २०१९-२०२० चा मासेमारी हंगाम दि. ०१ ऑगस्ट २०१९ पासून सूरु झाला. तथापि, माहे ऑगस्ट ते ऑक्टोबर,२०१९ मध्ये वादळी हवामानामुळे आणि दि. २४ ऑक्टोबर, २०१९ ते दि. ०८ नोव्हेंबर, २०१९ या कालावधी दरम्यान अरबी समुद्रात निर्माण झालेल्या "क्यार" व "महा" या दोन चक्रीवादळामुळे मच्छीमारांना मासेमारी करता आलेली नाही. सर्व मच्छिमारांना जीवित व नौकांची हानी होऊ नये म्हणून मासेमारी न करता परत यावे लागले. त्याचप्रमाणे खलाशाचे वेतन, बर्फ, अन्नधान्य आणि डिझेलचा निष्फळ वापर झालेला आहे. तसेच काही मच्छिमारांना जाळी काढता न आल्याने तशीच समुद्रामध्ये सोडून नौकासह परत येणे भाग पडल्यानेही मोठे आर्थिक नुकसान झालेले आहे. सन २०१९-२०२० या वर्षाच्या मासेमारी हंगामामधील राज्यातील सागरी जिल्हयातील मच्छिमारांना पूर्ण क्षमतेने मासेमारी करता आलेली नाही, त्यामुळे त्यांचे प्रचंड आर्थिक नुकसान झालेले आहे. प्रमुख मासेमारी हंगामात पूर्ण क्षमतेने मासेमारीस जाता न आल्याने झालेल्या मत्स्य पिकांच्या (मत्स्य उत्पादन) नुकसानी पोटी मच्छीमारांना दिनांक ०५.०७.२००८ रोजीच्या शासन निर्णयाच्या धर्तीवर आर्थिक मदत मिळणेबाबत सागरी जिल्हयातील मा.लोकप्रतिनिधी, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, महाराष्ट्र मच्छिमार कृती समिती व मच्छिमार सहकारी संस्थांनी निवेदनाव्दारे मागणी केलेली आहे. त्यास अनुसरुन राज्यातील मच्छिमारांना विशेष आर्थिक सहाय्य मंजूर करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** -

राज्याच्या मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग या सागरी जिल्हयातील मच्छिमारांसाठी विशेष आर्थिक सहाय्यातंर्गत रुपये ६५,१७,२०,०००/- (रुपये पासष्ट कोटी सतरा लाख वीस हजार फक्त) इतके विशेष सानुग्रह अनुदान खालीलप्रमाणे बाबनिहाय मंजूर करण्यास शासनाची मान्यता येत आहे.

| अ.क्र . | मत्स्यव्यवसायाशी निगडीत घटक | लाभार्थी संख्या | अर्थसहाय्य (रूपये) |
|---|---|---|---|
| | | रापण संघसभासद / मासळी विक्रेता / नौकाधारक | |
| १ | रापणकार संघाचे सभासद (प्रति सभासद १०,०००/-) | ४,१७१ | ४,१७,१०,००० |
| २ | बिगर यांत्रिक नौकाधारक (प्रत्येकी रु.२०,०००/-) | १,५६४ | ३,१२,८०,००० |
| ३ | १-२ सिलेंडर नौकाधारक (प्रत्येकी रु.२०,०००/-) | ४,६४१ | ९,२८,२०,००० |
| ४ | ३-४ सिलेंडर नौकाधारक (प्रत्येकी रु.३०,०००/-) | १,५२६ | ४,५७,८०,००० |
| ५ | ६ सिलेंडर नौकाधारक (प्रत्येकी रु. ३०,०००/-) | ७,६७१ | २३,०१,३०,००० |
| ६ | लहान मासळी विक्रेता मच्छिमारांना ५० लि.क्षमतेच्या दोन शितपेटया पुरवठा (प्रत्येकी रु.३,०००/-) | ३५,००० **(अंदाजित)** | २१,००,००,००० |
| | **एकूण** | **५४,५७३** | **६५,१७,२०,०००/-** |

राज्यातील सागरी जिल्हयातील मच्छिमारांना विशेष आर्थिक सहाय मंजूर करण्यासाठी लाभार्थ्यांची निवड व निधीचे वितरण करण्यासाठी जिल्हा स्तरावर पूढीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

## <u>जिल्हा लाभार्थी निवड व वितरण समिती</u> : -

| अ.क्र. | सभासदांचे नांव | पदनाम |
|---|---|---|
| १. | संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय | अध्यक्ष |
| २. | संबंधित जिल्हयाचे मत्स्यव्यवसाय प्रशिक्षण अधिकारी | सदस्य |
| ३. | अशासकीय सभासद | सदस्य |
| ४. | अशासकीय सभासद | सदस्य |
| ५. | परवाना अधिकारी | सदस्य सचिव |

विशेष आर्थिक सहाय मंजूर करण्यासाठी लाभार्थी निवडीच्या पात्रता खालीलप्रमाणे राहतील.

१. लाभार्थी राज्यातील सागरी जिल्हयातील रहिवाशी असावा, त्याच्याकडे बायोमेट्रीक कार्ड किंवा आधारकार्ड अथवा किसान क्रेडीट कार्ड असावे,

२. लाभार्थी नोंदणीकृत मच्छिमार सहकारी संस्थेचा क्रियाशील मच्छिमार सभासद असावा

३. लाभार्थी सहकारी संस्था असल्यास ती नादारी झालेली बंद पडलेली नसावी अथवा ती शासनाचे कर्जांची थकबाकीदार नसावी किंवा सहकारी संस्था काळया यादीत टाकलेली नसावी

४. कुटुंब प्रमुख किंवा कुटुंबातील इतर व्यक्ती अनेक सहकारी संस्थामध्ये सभासद असल्यास कुटुंबातील एकाच व्यक्तीस कोणत्याही एकाच संस्थेमध्ये लाभ मंजूर करण्यात यावेत.

५. मासेमारी नौकेची रिअल क्राफ्ट प्रणाली अंतर्गत नोंदणी झालेली असावी.

६. लाभार्थी मासेमारी नौका मालक असल्यास सदर नौकेमार्फत महाराष्ट्र सागरी मासेमारी नियमन अधिनियम १९८१ कायद्याचे वा त्यामधील तरतूदीचे/आदेशाचे/अधिसूचनेचे उल्लंघन झालेले नसावे तसेच नौकेवर प्रतिवेदन वा खटला दाखल नसावा.

७. लाभार्थी नौका मालक असल्यास आर्थिक सहाय्य देण्यात येणाऱ्या कालावधीचा नौकेचा विधिग्राह्य मासेमारी परवाना असावा.

८. लाभार्थी लहान मासळी विक्रेता असल्यास त्यांना महानगरपालिका, नगरपालिका, नगर परिषद किंवा ग्रामपंचायत यांनी मासळी विक्रेता अथवा फेरीवाला म्हणून परवाना किंवा पावती दिलेली असावी.

९. लाभार्थ्यांचे राष्ट्रीयकृत बँकेत बचत खाते उघडलेले असावे.

१०. मच्छिमार सहकारी संस्थेचे सभासद मृत असल्यास त्यांचे सहकारी कायद्यातील तरतूदीनुसार विहित असलेल्या वारसदरास सभासद म्हणून घोषित कले असेल तरच पात्र ठरविण्यात यावे.

११. लहान मासळी विक्रेत्यांनी शितपेटी विकत घेतल्याची पावती १५ दिवसांत संबंधित जिल्हा कार्यालयास सादर करणे आवश्यक राहिल.

सर्व प्रकारच्या विशेष आर्थिक सहाय्यक अनुदानाच्या रक्कमा रोखीने अदा न करता लाभार्थ्यांच्या थेट बँक खात्यामध्ये (डीबीटी) जमा करण्यात याव्यात.

प्रस्तूत विशेष आर्थिक सहाय्य कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी पर्यवेक्षक अधिकारी म्हणून प्रादेशिक उपायुक्त मत्स्यव्यवसाय, मुंबई व नियंत्रण अधिकारी म्हणून आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई हे राहतील. तसेच या कार्यक्रमाची अंमलबजावणी करतांना अनुदान वाटप व्यवस्थितपणे आणि त्याच बाबीवर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये उपरोक्त प्रस्तावित सानुग्रह अनुदानावरील खर्च रुपये ६५,१७,२०,०००/- ( रुपये पासष्ट कोटी सतरा लाख वीस हजार फक्त ) खालील लेखाशिर्षाखाली मंजूर निधीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक मागणी क्रमांक डी - ६ , २४०५-मत्स्यव्यवसाय ,
(००)(१०३) - सागरी मत्स्यव्यवसाय
(०१)(०४) - नैसर्गिक आपत्तीत मृत पावलेल्या मच्छिमारांच्या वारसांना सहायक अनुदान (अनिवार्य) (२४०५ १२८७)
३१ - सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

सदर शासन निर्णय मंत्रीमंडळाच्या दिनांक ०७.०९.२०२० रोजीच्या इतिवृत्तान्वये प्राप्त मान्यतेनुसार आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५७/व्यय २, दि. ०९.०९.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०९१५०६३२०५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6,
serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2020.09.09 15:09:39 +05'30'

**( अनूप कुमार )**
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री (मत्स्यव्यवसाय) यांचे खाजगी सचिव

३. मा. राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा व विधानपरिषद.
५. मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७. आयुक्त, दुग्धव्यवसाय , महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय , मुंबई
९. सहायक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१०.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२.जिल्हा कोषागार अधिकारी/ उप कोषागार अधिकारी,, मुंबई, मुंबई उपनगर, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी व सिंधुदुर्ग
१३.सहसंचालक, लेखा व कोषागरे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर,मुंबई
१४.अवर सचिव/ कक्ष अधिकारी (पदुम १२, पदुम १३, पदुम १६)
१५.कक्ष अधिकारी (व्यय/अर्थसंकल्प) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६.कक्ष अधिकारी, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.निवडनस्ती